**निविदा स्विकृती करताना अंदाजपत्रक अद्ययावत करतानाची कार्यपध्दती.**

**<u>महाराष्ट्र शासन</u>**
**जलसंपदा विभाग,**
**शासन शुध्दीपत्रक** क्रः निविदा-०४१०/(१९२/२०१०)/मोप्र-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०४ ऑगस्ट, २०१०

**वाचा :-** १) शासन परिपत्रक जलसंपदा विभाग क्र. निविदा-०४१०/(१९२/१०)/मोप्र-१, दि.१९.०५.२०१०

**<u>शासन शुध्दीपत्रक</u>**

संदर्भीय शासन परिपत्रकातील **वाचा** या निदेशासमोरील संदर्भ क्र. *२ ) शासन परिपत्रक जलसंपदा विभाग क्र. निविदा-३०८/(१८२/०८)/मोप्र-१ दिनांक २५.०४.२००८* हा वगळण्यात येत आहे.

तसेच संदर्भीय शासन परिपत्रकातील मुद्दा क्र. ७ खालीलप्रमाणे आहेः

*७) निविदा अधिक्यास मान्यता देणाऱ्या अधिकाऱ्यांची व अधिक्याचा प्रस्ताव सादर करणाऱ्या अधिकाऱ्यांची निविदा प्रक्रियेची संयुक्त जबाबदारी राहील असे दिनांक २५.४.२००८ च्या परिपत्रकात निर्देशित असताना सदर परिपत्रकाचे पालन न झाल्याचे निदर्शनास आल्यास व त्यामुळे होणाऱ्या शासनाच्या आर्थिक नुकसानीचीही जबाबदारी ही संबंधित अधिकाऱ्यांची राहील व सदर प्रकरणी संबंधित अधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करुन कारवाई करण्यात येईल.*

**त्याऐवजी सदर मुद्दा कृपया खालीलप्रमाणे वाचावाः**

*७) निविदेची किंमत निश्चित केल्यानंतर निविदेची किंमत ही संबंधित अधिका-याच्या निविदा स्विकृतीच्या सक्षमतेमध्ये बसत नसेल तर त्या अधिका-याने सक्षम अधिका-याकडे सदर निविदा सादर करणे आवश्यक आहे व त्या प्रस्तावास त्याच्याकडून मंजूरी घ्यावी. या सूचनांचे अत्यंत काटेकोरपणे पालन होईल याची कृपया दक्षता घेण्यात यावी. सदर बाब ही निविदा प्रस्तावित करणा-या व अधिक्यास मान्यता देणा-या अधिका-याची संयुक्त जबाबदारी असेल. तसेच, सदर परिपत्रकाचे पालन न झाल्याने होणा-या शासनाच्या आर्थिक नुकसानीचीही जबाबदारी ही संबंधित अधिका-यांची राहील व संबंधित अधिका-यांवर जबाबदारी निश्चित करून कारवाई करण्यात येईल.*

या व्यतिरिक्त संदर्भित निर्गमीत केलेल्या परिपत्रकात कोणताही बदल नाही.

सदर शुध्दीपत्रक शासन बेवसाईटवर २०१००८०४१९१७५८००१ ठेवण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( दी. धों. भिडे )
मुख्य अभियंता व सहसचिव

प्रति,

सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता व पदसिध्द सहसचिव, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता व पदसिध्द उपसचिव, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, व पदसिध्द अवर सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे.
सर्व क्षेत्रीय मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व क्षेत्रीय अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व क्षेत्रीय कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व तांत्रिक कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व उप अभियंता जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता (मोप्र-१) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मो.प्र.-१, निवडधारिका,